अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ मधील तरतुदीनुसार केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांनी अपंगासाठी सुनिश्चित केलेली पदे जिल्हा परिषदांतर्गत आस्थापनांवरील गट-क व गट-ड पदांना लागू करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः अंपग-२०१८/प्र.क्र.२५७/आस्था-८**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई-४००००१.

दिनांक :- २९ डिसेंबर, २०१८

# शासन शुध्दीपत्रक

**वाचा:-**

१) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१)

२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.अपंग-२०१०/प्र.क्र.२५०/अस्था-९, दि.१४/०१/२०११

३) शासन निर्णय , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.न्यायाप्र-२०११/प्र.क्र.४/सुधार-३, दि.१७/०३/२०११

४) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.अपंग-२०१०/प्र.क्र.२५०/ आस्था-९, दि.७ जुलै,२०११

**शासन शुध्दीपत्रक:-**

१. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५ नुसार जिल्हा परिषदांतर्गत गट-क व गट-ड मधील पदावर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी केंद्र शासनाने अपंगाच्या पद निश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार सुयोग्य पदे निश्चित करण्याबाबत ग्राम विकास व जलसंधारण विभागाचा संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१४ जानेवारी,२०११ चा शासन निर्णय रद्द करण्यात येवून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा क्र.न्यायाप्र-२०११/प्र.क्र.४/सुधार-३, दि.१७/०३/२०११ चा शासन निर्णय लागू करण्यात आलेला आहे.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वरीलप्रमाणे दि.१७/०३/२०११ चा शासन निर्णय निर्गमित केला असला तरी जिल्हा परिषदांमध्ये कार्यरत असलेल्या पदांचे वेगळेपण विचारात घेता ग्राम विकास विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील अधिक्रमित केलेल्या दिनांक१४/०१/२०११ च्या शासन निर्णयामधील

परिशिष्ट "अ" मध्ये जिल्हा परिषदेला कोणत्या पदासाठी कोणत्या वर्गवारीतील अपंग व्यक्तीसाठी आरक्षण ठेवावे याबाबतचे निकष तपशीलवारपणे नमूद केलेले आहेत. तथापि, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.१७/०३/२०११ च्या शासन निर्णयात तसा कोणताही उल्लेख नाही.

३. अपंग प्रवर्गातील पदभरती करिता वरील संदर्भ. क्र.२ येथील शासन निर्णयाच्या परिशिष्ट "अ" ची आवश्यकता असल्याने संदर्भ क्र.२ मधील शासन निर्णय दि. १४/०१/२०११ सोबतचे **परिशिष्ट "अ " कायम ठेवण्यात येत आहे.**

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२८१७०५३३१२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyadarshan S Kamble

Digitally signed by Priyadarshan S Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f18890edb030995db4323c71a3bdecddde94daa5425bbe713b2e2a5b7d6fa779, cn=Priyadarshan S Kamble
Date: 2018.12.29 13:08:47 +05'30'

**( प्रि.शं.कांबळे)**
अवर सचिव, ग्राम विकास विभाग

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

६) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय, मुंबई

७) प्रधान सचिव ( माहिती व तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सचिव (ग्रा.वि.व पं.रा.), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई

९) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

११) निवड नस्ती आस्था-८